आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षात केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान-वनशेती उपअभियान योजनेकरीता निधी वितरण.
केंद्र हिस्सा - २४०१ अे ८४२
राज्य हिस्सा - २४०१ अे ८५१

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/ प्र.क्र.०७ / कार्यासन-६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२**
**तारीख : ११ नोव्हेंबर, २०२१.**

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१ /प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२) कृषी व पदुम विभागाची नस्ती क्र.वनशेती-०८२१/प्र.क्र. १३३ (भाग-३)/कार्या-१४ अे

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषी व पदुम विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान-वनशेती उपअभियान या योजनेचा सन २०२०-२१ मधील अखर्चित असलेला निधी केंद्र हिस्सा रु.११.५६३९९ लाख व समरुप राज्य हिस्सा रु.७.७० लाख इतका निधी सन २०२१-२२ च्या आर्थिक तरतुदींतून वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.२ अन्वये सादर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र. टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष, २४०१, पीक संवर्धन - राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानवनशेती- उप अभियान केंद्र हिस्सा सन २०२०-२१ मधील प्रलंबित निधीसाठी वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदींतून केंद्र व राज्य हिश्श्यासाठी **एकूण रु.१९.२६३९९ लाख** इतका निधी वितरीत करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

**(रु.लाखात)**

| **योजनेचे नाव** | **लेखाशिर्ष व केंद्र / राज्य हिस्सा** | **बाब** | **सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पीत तरतूद** | **सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान- वनशेती उपअभियान | २४०१ A ८४२ केंद्र हिस्सा (६० टक्के) | ३३, अर्थसहाय्य | ३०.०० | ११.५६३९९ |
| | २४०१ A ८५१ राज्य हिस्सा (४० टक्के) | | २०.०० | ७.७० |
| **एकूण** | | | **५०००.००** | **१९.२६३९९** |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.१९.२६३९९ लाख (अक्षरी रुपये एकोणीस लाख सव्वीस हजार तीनशे नव्याण्णव फक्त)** इतका निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून सचिव, कृषी विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. प्रकरणी विभागप्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात मात्र फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि अनौपचारिक संदर्भ क्र.९१६/व्यय-१४, दि.१८.१०.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११०२१७३९५९११२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, pseudonym=4D88F77C99929CC895AC64CF186BB11E7252442D, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2021.11.11 17:12:43 +05'30'

**( किरण कि. पवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त ( कृषि), महाराष्ट्र राज्य,पुणे.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
७. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
८. कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग